**लातूर शहर महानगरपालिकेतील "शहर अभियंता" या रिक्त पदावर श्री.नवनाथ काकासाहेब केंद्रे, नगरपरिषद अभियांत्रिकी सेवा (स्थापत्य) श्रेणी-अ यांच्या प्रतिनियुक्तीने केलेल्या नियुक्तीस मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- लामपा-२०२२/प्र.क्र.१९/नवि-२४**
४ था मजला (मुख्य इमारत), मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १७ एप्रिल, २०२३

<u>वाचा:-</u> १) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.नपप्रसं-३ संवर्ग/प्रतिनियुक्ती/प्र.क्र.४०१ /२०२१/कक्ष-३/, दिनांक २७.१.२०२२.
२) या विभागाचा समक्रमांकाचा दि.२९.३.२०२२ रोजीचा शासन निर्णय.
३) आयुक्त तथा प्रशासक, लातूर शहर महानगरपालिका यांचे दि.७.९.२०२२ रोजीचे पत्र.
४) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई यांचे दि.३१.१.२०२३ रोजीचे पत्र.

<u>प्रस्तावना</u>:-

लातूर शहर महानगरपालिकेकरीता एकूण १२४६ पदांचा आकृतीबंध दिनांक २८.५.२०१३ रोजी च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आला आहे. सेवाप्रवेश नियमानुसार "शहर अभियंता" हे पद १०० टक्के पदोन्नतीचे असून योग्य अधिकारी उपलब्ध होईपर्यंत प्रतिनियुक्तीने भरण्याची तरतूद उपलब्ध आहे.

०२. त्यानुसार, श्री.नवनाथ काकासाहेब केंद्रे, नगरपरिषद अभियांत्रिकी सेवा (स्थापत्य) श्रेणी-अ यांची संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये लातूर शहर महानगरपालिकेत “शहर अभियंता” या पदावर प्रतिनियुक्तीने एक वर्षाच्या कालावधीकरिता नियुक्ती करण्यात आली होती. श्री.केंद्रे यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी दि.२९.३.२०२३ रोजी संपुष्टात येत आहे.

०३. सद्यस्थितीत सदर पदावर पदोन्नतीने नियुक्त करण्यासाठी उमेदवार उपलब्ध नाही. राज्य शासनाच्या विविध योजने अंतर्गत मंजूर कामे महानगरपालिका क्षेत्रात सूरू असून सदर योजनेची प्रभावी अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीने महानगरपालिकेकडे सक्षम तांत्रिक अधिकारी उपलब्ध नसल्याने शासनाच्या योजनांमधील कामांवर त्याचा परिणाम होणार असल्याने श्री.केंद्रे यांच्या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्याची विनंती आयुक्त तथा प्रशासक, लातूरा शहर महानगरपालिका यांनी त्यांच्या संदर्भाधीन क्र.३ च्या पत्रान्वये केली आहे.

०४. आयुक्त तथा प्रशासक, लातूर शहर महानगरपालिका यांच्या विनंतीच्या अनुषंगाने नगरपरिषद प्रशासन संचालनायाकडून अभिप्राय मागविले असता, त्यांनी त्यांच्या संदर्भाधीन क्र.४ च्या पत्रान्वये मुदतवाढ देण्याची शिफारस केली आहे.

०५. आयुक्त तथा प्रशासक, लातूर शहर महानगरपालिका यांची विनंती व नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांच्याकडून प्राप्त शिफारशीनुसार श्री.केंद्रे यांच्या लातूर शहर महानगरपालिकेतील “शहर अभियंता” या रिक्त पदावरील प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

श्री.नवनाथ काकासाहेब केंद्रे, नगरपरिषद अभियांत्रिकी सेवा (स्थापत्य) श्रेणी-अ यांच्या लातूर शहर महानगरपालिकेतील "शहर अभियंता" या रिक्त पदावरील प्रतिनियुक्तीस दि.३०.३.२०२३ पासून १ वर्ष म्हणजेच दि.२९.३.२०२४ पर्यंत मुदवाढ देण्यात येत आहे. श्री.केंद्रे, यांच्या प्रतिनियुक्ती मुदतवाढ संदर्भात या विभागाच्या समक्रमांकीत दि.२९.३.२०२३ रोजीचा शासन निर्णयातील अटी व शर्ती कायम असतील.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०४१७१६४५५७७२२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2023.04.17 16:53:03 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई.
३) आयुक्त तथा प्रशासक, लातूर शहर महानगरपालिका, लातूर.
४) प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
५) श्री.नवनाथ काकासाहेब केंद्रे, शहर अभियंता, लातूर शहर महानगरपालिका, लातूर.
६) निवड नस्ती, नवि-२४.